**सन २०२० व २०२१ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार विजेते शेतकऱ्यांना पुरस्काराची रक्कम अदा करण्याकरिता निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- पुरस्कार -२०२४/प्र.क्र.०७/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १२ मार्च, २०२४

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. कृपु-२०२०/प्र.क्र.१२/४अे, दि.१५/०२/२०२१
२) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र जा.क्र./कृमावि/विप्र-४/कृ.पु.गु.प.नि./२५१५०/२०२३, दि.३१/०७/२०२३
३) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र जा.क्र./कृमावि/विप्र-४/पुरस्कार नि./१४/२०२४, दि.२४.०१.२०२४
४) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.कृमावि/विप्र-४/पुरस्कार/२८/२०२४, दि.१६.०१.२०२४
५) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२२/प्र.क्र.५८/४अे, दि.०७/०२/२०२४
६) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. पुरस्कार-२०२४/प्र.क्र.०५/४अे, दि.२३/०२/२०२४

**प्रस्तावना :-**

राज्यात कृषि, कृषि संलग्न क्षेत्र तसेच फलोत्पादन क्षेत्रामध्ये उल्लेखनीय कार्य करणाऱ्या व्यक्ती/संस्था यांना डॉ. पंजाबराव देशमुख कृषिरत्न पुरस्कार, वसंतराव नाईक कृषिभूषण पुरस्कार, जिजामाता कृषिभूषण पुरस्कार, कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कार, वसंतराव नाईक शेतीमित्र पुरस्कार, युवा शेतकरी पुरस्कार, उद्यानपंडीत पुरस्कार, वसंतराव नाईक शेतीनिष्ठ शेतकरी पुरस्कार (सर्वसाधारण गट/आदिवासी गट), पद्मश्री डॉ. विठ्ठलराव विखे पाटील कृषि सेवारत्न पुरस्कार (आयुक्तालय/मंत्रालय स्तर) असे विविध पुरस्कार प्रदान करुन सन्मानीत करण्यात येते. त्यानुषंगाने सन २०२०, २०२१ व २०२२ करीता विविध कृषि पुरस्कार प्रदान करुन शेतकरी/संस्था यांचा सन्मान करण्यास दि.२३ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान केली आहे. तसेच पुरस्कारांच्या रकमेमध्ये व दैनिक व प्रवास भत्त्यांच्या रकमेमध्ये दि.०७ फेब्रुवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये वाढ करण्यात आली आहे. या अनुषंगाने सन २०२० व २०२१ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार विजेते शेतकऱ्यांना पुरस्काराची रक्कम अदा करण्याकरिता रु.२४०.०० लक्ष रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२० व २०२१ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार विजेते शेतकऱ्यांना अनुज्ञेय पुरस्काराची रक्कम अदा करण्याकरिता रु.२४०.०० लक्ष (रुपये दोन कोटी चाळीस लाख) निधी वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी सन २०२३-२४ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा:-

मागणी क्र.डी-३
२४०१-पीक संवर्धन
१०९-विस्तार व शेतकरी प्रशिक्षण
०१-माहिती व प्रसार
(०१) (०३) पीक स्पर्धा (कार्यक्रम),
(२४०१ ०७५३) ५०, इतर खर्च

३. या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व संवितरण करण्याकरिता पुढील अधिका-यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हास्तर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

४. वितरीत केलेला निधी तातडीने खर्च करावा व वितरीत केलेला निधी बँक खात्यावर पडून राहणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपण पालन करावे.

६. सदर वितरीत निधीच्या अंतर्गत झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे सादर करण्याची कार्यवाही कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१२/०४/२०२३, ०८/१२/२०२३ व दि.०४/०३/२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर पुरस्काराची अनुज्ञेय रक्कम संबंधित शेतकरी/संस्था यांना RTGS/ECS प्रणाली द्वारे त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्यात यावी. विभागून देण्यात आलेल्या पुरस्काराच्या बाबतीत पुरस्कारासाठीची रक्कम विभागून देण्याची कार्यवाही करण्यात यावी.

९. सदर पुरस्कार वितरणाचा कार्यक्रम आयोजित करतेवेळी संबंधित शेतकरी/संस्था यांना यथोचित सन्मानपत्र देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

१०. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.४३/२०२४/व्यय-१, दि.१६/०२/२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१२१६०९२३८२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.03.12 16:19:06 +05'30'

( महेंद्र घाडगे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति -**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
११. विभागीय कृषी सहसंचालक, नाशिक
१२. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नाशिक
१३. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
१७. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१८. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती-४अे